**एकात्मिक बाल विकास सेवा योजनेअंतर्गत असलेल्या अंगणवाडयांना सन २०११-१२ या आर्थिक वर्षासाठी "लोकस्वास्थ्य" हे आरोग्यविषयक त्रैमासिक पुरविणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
महिला व बाल विकास विभाग
शासन निर्णय क्रमांक - एबावि-२०११/प्र.क्र.५३७/का.६
शिबीर कार्यालय, नागपूर, नवीन हैद्राबाद हाऊस, ३ रा मजला,
सिव्हिल लाईन, नागपूर
दिनांक :- २१ डिसेंबर, २०११

**वाचा :-** आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे क्र. मबावि/एबाविसे/का-५/५४०७/२०११, दिनांक ०१.१२.२०११ चे पत्र.

**शासन निर्णय** - एकात्मिक बाल विकास सेवा योजना या केंद्र पुरस्कृत योजनेअंतर्गत सन २०१२-१३, २०१३-१४ व २०१४-१५ या आर्थिक वर्षाकरिता प्रत्येक तीन महिन्याला त्रैमासिक स्वरुपात ३६ पानी (१०" x ८" या आकाराचे तसेच मुखपृष्ठाचे पान रंगीत व आतील पाने साध्या पेपर मध्ये) प्रति अंक रु.१५/- या दराने पोस्टेज खर्चासह "लोकस्वास्थ्य" हे आरोग्य विषयक त्रैमासिक कार्यरत अंगणवाडी केंद्रांच्या संख्येप्रमाणे व प्रत्येक प्रकल्प कार्यालयासाठी एक प्रत व जिल्हा कक्षाकरिता प्रत्येकी एक प्रत याप्रमाणे खरेदी करण्यास या शासन निर्णयानुसार प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे. त्यानुसार सन २०११-१२ या आर्थिक वर्षाकरिता राज्यातील ग्रामीण / आदिवासी प्रकल्पातील ७६,००० अंगणवाडी केंद्र व नागरी प्रकल्पातील १४,००० अंगणवाडी केंद्रांना प्रत्येकी १ प्रत याप्रमाणे एकूण ९०,००० "लोकस्वास्थ्य" हे आरोग्य विषयक त्रैमासिक प्रत्येक तीन महिन्याला एक याप्रमाणे सन २०११-१२ या आर्थिक वर्षाकरिता प्रति अंक रु.१५/- या दराने माहे जानेवारी, २०१२ ते मार्च, २०१२ या त्रैमासिक कालावधीचा अंक खरेदी करण्यास व त्यासाठी होणा-या रु.१३,५०,०००/- (रुपये तेरा लाख पन्नास हजार फक्त) एवढया वार्षिक खर्चास खालील अटींच्या अधीन राहून शासन मान्यता देण्यात येत आहे :-

१. हा अंक १०" x ८" या आकाराचे तसेच मुखपृष्ठाचे पान रंगीत व आतील पाने साध्या पेपर मध्ये ३६ पानी (जाहिरातीची पाने वगळून) या स्वरुपात असावा.

२. या अंकात अंगणवाडी कर्मचारी /अधिकारी यांचेकडून अंगणवाडीबाबत लेख प्राप्त झाल्यास त्याला प्राधान्याने छापावे.

३. अंकाच्या संपादनाबाबत सल्ला देण्याचा अधिकार आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना असेल व तो संपादकास बंधनकारक राहील.

४. आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे व शासनाकडून प्राप्त झालेले लेख, शासकीय पत्र, सूचनापत्र, इत्यादी छापणे संपादकांवर बंधनकारक राहील.

५. अंकाच्या प्रती पोस्ट विभागातील बिझनेस पोस्ट या लेखाशिर्षाखाली प्रति अंक नियमाप्रमाणे सेवा कर भरुन पाठविण्यात यावा. अशा रितीने पोस्टांद्वारे प्रती पाठविण्याची खात्री करुन पुरवठा केलेल्या त्रैमासिकाची रक्कम अदा करण्यात यावी. सदर त्रैमासिक संबंधित कार्यालयात प्राप्त न झाल्यास पुन:श्च पाठविण्याची जबाबदारी संपादकावर राहील.

६. हे त्रैमासिक त्या-त्या त्रैमासिक कालावधीत संबंधित बाल विकास प्रकल्प अधिकारी यांच्या कार्यालयीन पत्यावर वरील अट क्र.५ वर नमूद केल्याप्रमाणे पाठविण्याची जबाबदारी संपादकाची राहील. याबाबतच्या सूचना आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी सर्व संबंधितांना द्याव्यात.

२. यासाठी होणारा खर्च :-

**(अ) ग्रामीण / आदिवासी प्रकल्प -**

**(१) केंद्र शासनाचा ९०% हिस्सा रक्कम रु.१०,२६,०००/-**

**लेखाशिर्ष** - मागणी क्र. एक्स-१, मुख्य लेखाशिर्ष २२३६- पोषण आहार, ०२ पोषक अन्न व पेय यांचे वितरण, १०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना-ग्रामीण (०४) (०१) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना आस्थापना अनुदान (२२३६००७२) (स्थानिक क्षेत्र) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)

**(२) राज्य शासनाचा १०% हिस्सा रक्कम रु.१,१४,०००/-**

**लेखाशिर्ष** - मागणी क्र. एक्स-१, मुख्य लेखाशिर्ष २२३६- पोषण आहार, ०२ पोषक अन्न व पेये यांचे वितरण, १०१ विशेष पोषण आहार कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (ग्रामीण) (०४) (०६) महाराष्ट्र जिल्हा परिषद व पंचायत समिती अधिनियम १९६१ च्या कलम १२३ व २६१ अन्वये जिल्हा परिषदांना एकात्मिक बाल विकास सेवा योजने करीता अनुदाने (२२३६१३७३) (१०% राज्य हिस्सा) ३१ सहाय्यक अनुदान (वेतनेत्तर)

**(ब) नागरी प्रकल्प -**

**(१) केंद्र शासनाचा ९०% हिस्सा रक्कम रु.१,८९,०००/-**

**लेखाशिर्ष** - मागणी क्र. एक्स-१, मुख्य लेखाशिर्ष २२३६ - पोषण आहार, ०२ पोषक अन्न व पेय यांचे वितरण, १०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम, केंद्र पुरस्कृत योजना (नागरी) (०१) (०३) एकात्मिक बाल विकास सेवा योजना (केंद्र पुरस्कृत योजना ९० टक्के) (२२३६०५१९) २६ जाहिरात व प्रसिध्दी

**(२) राज्य शासनाचा १०% हिस्सा रक्कम रु.२१,०००/-**

**लेखाशिर्ष -** मागणी क्र. एक्स-१, मुख्य लेखाशिर्ष २२३६ पोषण आहार, ०२, पोषक अन्न व पेये यांचे वितरण, १०१, विशेष पोषण आहार कार्यक्रम, राज्य योजनांतर्गत योजना (नागरी) (०१) (०८) एकात्मिक बाल विकास सेवा योजना - अंमलबजावणी व प्रशासकीय खर्च (२२३६१३८२) (१०% राज्य हिस्सा) २६ जाहिरात व प्रसिध्दी या उपलेखाशिर्षाखालील सन २०११-१२ या वर्षाच्या मंजूर तरतूदीतून भार्गावण्यात यात्रा व तो त्याच लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा. या करिता आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे यांना ''आहरण, संवितरण व नियंत्रक अधिकारी'' म्हणून घोषित करण्यात येत आहे

३. हा शासन निर्णय वित्तीय अधिकार व नियम पुस्तिका १९७८ भाग पहिला उपविभाग दोन अनुक्रमांक ४३ अ नियम क्र.१४० अन्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकाराच्या अधिन राहून निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

(प्रकाश जोशी)
अवर सचिव

प्रति,
आयुक्त, महिला व बाल विकास, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद
सर्व उप मुख्य कार्यकारी अधिकारी, (बाल कल्याण), जिल्हा परिषद
महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र १/२, मुंबई / नागपूर
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई
निवासी लेखा परिक्षा अधिकारी मुंबई
सहायक संचालक, (वित्त व लेखा) मवबावि, महाराष्ट्र राज्य, पुणे
सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई
महिला व बाल विकास विभाग, कार्यासन क्र.४
निवड नस्ती (कार्यासन ६)